ई-साहित्य प्रकाशन

अंक क्र. ३२ दि. २२ जून २००९




यजमान संपादक –
**सचिन काकडे (मुंबई )**

सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**
**सारंग भणगे (पुणे)**
**भारती सरमळकर ( मुंबई )**

अंगणात अक्षरांनी
सजलाय पारिजात ...
मन मुक्तछंद गंध
तरी दरवळे सुरात ...

## संपादकीय-

सुरांनी सावरलेल्या मनाला कौलारु घराचं सारवलेलं ‘अंगण’ आठवलं....
कोवळया पावलांनी कसं मन अंगणात रांगायचं...., खेळायचं....,
अंगणात  चांदणं पडलं की.... आज्जी त्याला गोष्ट सांगायची
राजा-राणीची, प-यांच्या देशातली....
जोवर अंगणात  चांदणं तोवर गोष्ट असं आज्जी म्हणायची....
गोष्ट संपत आली की आभाळाकडं बघायची....
मन तोपर्यंत स्वप्नांच्या देशात पोहोचलेलं असायचं....
पण तिथही त्याला आज्जीसोबत एक अंगण लागायच....
त्याच्या अगोदर तेव्हा पहाट जागी व्हायची.... अंगणभर दिसायची....
अंगणातल्या सड्यातली फुलं ओली-ओली व्हायची.... तेव्हा मन उठायचं....
दिवस उतरायला आला की पाखरांची किलबिल....
आभाळाला यांची गाणी कशी बरं कळतील?
उगाचं आपलं वाटायचं.... त्यांच्या सोबत गायचं.... आभाळबाबा हसायचा....
त्याच्यासोबत गायचा.... मग पाउस यायचा.... ईवल्याश्या हातावर दोन थेंब ठेवायचा....
‘मनासारखा’ तेव्हा पाउस खरचं लहान व्हायचा.... अंगणभर नाचायचा....
पण आता मन मोठ्ठं झालं....
तसा पाऊसही झालां....
आता आभाळबाबा हसत नाही.... पाउससुध्दा नाचत नाही....
फ़क्त बरसतो आतल्या आत ‘मनात’
आता चांदणही पडत नाही.... पडलं तरी दिसत नाही....
आज्जीसारखं लांब गेलं.... आभाळात हरवलं....
आभाळाच्या पदराला आता फ़क्त आठवणीं....
‘मुक्या अंगणाच्या’
अंगणातल्या फ़ुलांच्या
फ़ुलांचे ‘शब्द’ होतात....
शब्दांची ‘माळ’
माळेचं ‘पैंजण’
आठवलेलं ‘अंगण’

**-सचिन काकडे**




**माझी घेशील ना !**

शहरात हल्ली चिमण्याच दिसत नाहीत
अंगणात दाणे टिपणा-या
शहरात हल्ली
अंगणंच दिसत नाहीत
फुलझाडांनी नटलेली
शहरात हल्ली
फुलझाडचं दिसत नाहीत
फुलांनी डवरलेली
----------------
शहरात हल्ली
फुलं मात्र खूप दिसतात
विकायला आलेली

**-नाम गुम जायेगा**

जपल्या आठवांची टीप
तो वाहतो धरेला
रात जागवितो सारी
सडा प्राजक्त उषेला

रोज गदगद हलवत
ती विचारते त्याला
त्याचं दुःख
मग कुठल्याश्या हिमतीने
बिलगते त्याला
आणि इतकंच म्हणते
काश!
माझ्याही दुखःची
अशीच फुलं झाली असती !!

वेचताना आठवणी त्या
झोक्यासवे झुळकतो वारा
रुंझी घालतो ह्याच अंगणी
त्या अंगणीचा जन्म सारा

**---अमृता ढगे**




---------ओली फुले--------------

चांदणे वेचून गेले, कालची ओली फुले
अंगणाला आठवांचे, बांधले कोणी झुले ।।

त्या झुल्यांवर गायला, सांजही  बोलावली
श्वासासवेत झुलते, तेथे कळयांची सावली ।।

सावलीच्या पावलांना, चाहुलीची पैंजणे
हाक जाई अंबरात, अंतराची गुंजने ।।

साद येता धुंद वारा, शब्द त्याचा पाळतो
बेभान होतो, वाजतो, पाचोळा धुंडाळतो ।।

भास झाला अंतराला, त्यासही कळले कुठे
मीच नाही आत माझ्या, अन तुला शोधू कुठे ।।

या जीवाचे त्या जीवाला, सांगणे साधून तोल
विस्मृतीची पर्वा कशाला रातही देतेच ओल ।।

ओल सारी खोल जाते, अंति कळयांवर वाहते
चांदणे नेती  फुले अन, कविता तिथेच राहते ।।

**सचिन काकडे**



सारं अंगण पाण्याने
ओलं चिंब झालं
आणि यातच अवचित
स्वप्नांसारखं तु येउ केलं

तु म्हणालास,
बघ वेडे
पाउस कीती छान बरसतोय
वीज चमकली ढग गडाडले
कुठुनतरी वा-याची एक झुळुक आली
पाने थरारली, ओलावली फुले
थेंब-थेंब गळाली

वाटलं बरं झालं
याला कळलाच नाही
आसवांचा पाउस
डोळयात जपल्या
पाउल खूणा
त्याच्या अन,
पावसाच्या

**-मीनल चौगुले**

## हरवलेल अंगण

नको ग सखे आठवू
झिम्मा अन फुगडी

कधी खेळताना
माझी पडलेली बुगडी

तो अंगणातला सडा
ती तुळस
ते चांदण

कधी कधी रात्रीच
नक्षत्राच रांगण

ती गूढ, गूढ़ अन प्रसन्न सकाळ
जणू पावित्र्य, मांगल्याची स्पर्शवेळ

संभ्रमात मी आता
उन्ह का कोवळ कोवळ

अजून तसच असेल
का ?
माझं अंगण सोज्वळ

- **चैताली म्हापसेकर**



## मनपाखरू

माहेराच्या माझ्या गावी, वाडा असे तो चौसोपी ।
वाट नाही वाळणाची, आहे अगदी ती सोपी ।। धृ।।

घर असे ते कौलारू, तेथ नांदे दिगंबरू ।
क्षणोक्षणी त्याला स्मरू, आणि अवघा पंथ धरू ।।१।।

प्रेमाचे असे भांडार, मायेची ती साठवण ।
घडोघडी मज येई, माहेराची आठवण ।।२।।

मागेपुढे ते अंगण, दारी सडा सारवण ।
झाडवेली डोलताती, फुलांची ती पखरण।।३।।

परसात पारिजात, भासे मला माझा तात ।
वृंदावनात तुळस, वाटे मला माझी माय ।।४।।

जाईजुई ती शेवंती, माझ्या बहिणी असती ।
झेंडू आणि तो मोगरा, भाऊ माझा असे खरा ।।५।।

काऊचिऊ अंगणात, दाणे टिपती भराभरा ।
मोती रखवाला खरा, घालीतसे येरझारा ।।६।।

काळी कपिला ती गाय, गोठ्यामध्ये हंबरते ।
भुकेलेल्या पाडसाला, गोड दुध प्रेमे देते ।।७।।

माझ्या मनाचे पाखरू, माहेरास झेपावते ।
आणि अवघी भेट होते, मन माझे सुखावते ।।८।।

**श्रीमती. मंगला म. आमडेकर**




**एक आठवण**

एक आठवण
हेच ते आंगण
माती ओली ओली
केसात अबोली
हातात टिक्कर
तोंडात बोली बोली

एक आठवण
हेच ते आंगण
फुले वयात आली
पाने दवात न्हाली
मन खेळी रमेना
जादू डोळयात झाली

एक आठवण
हेच ते आंगण
ढ़ोल वाजंत्री आली
वेळ हळदीत न्हाली
माझ्या डोळयासमोर
माझी वरात निघाली

**तुषार जोशी**

**स्वागत तुझ !**

झालीया पहाट
चिवचिवली पाखर,
ऊठूनी लागली ग मी
स्वागताला तुझ्या !!

शिंपडते पाणी
लोटते ग कचरा मी,
सारवेन अंगण सार
काढीन रांगोळी मी !!

धुईन लख्ख उंबरा
ठीपके ठिपेण त्याला,
लाविन हळदी कुंकू
करेन स्वागत तुझ !!

येईल सुर्याजी
हसत घरी माझ्या,
खेळेल तो मनसोक्त
अंगणी माझ्या !!

होऊनी  सुवासन मी
करीन तेची पूजा,
घालीन पाणी तुळशीला
सांगेन तिला मनातल माझ्या !!

- **आनंद राजगोळे**

**चल ना एक दीप अंगणात लावू**

चल ना
एक दीप अंगणात लावू
उजेड त्याचा
तुझ्या माझ्या मनात
भरपूरसा साठवून घेऊ
मग मिटेल काळोख
कानाकोप-यात दडलेला
भिंतीच्या चेहे-यावर येईल भाव
उजाडलेला
उंबरठा ही बसल्याजागी
ताठ मान करेल
दारावरल तोरण
झोक्यामध्ये झुलेल
आलीय दिवाळी
एकमेकांना ह्दयाच्या आनंदाच्या
चला ना मिठीत घेऊ
चल ना एक दीप अंगणात लावू

**दिपक साळूंखे**

**अंगण बोलतय**

रोज सकाळी पारिजात
फुलांनी सजवायचा माझ मन
काटेती पण मवाळ निवडुंग
घालायचा माझ्या भावनांना कुंपण

दुडूदुडू धावणारे मऊमऊ पाय
रोज खेळायचे माझ्या अंगावर
छोट्याश्या चेंडूमागे पळणारे ते छोटे पाय
नेहमी तसेच राहिले असते तर

अनुभवताना स्वर्गीय सुगंध
मी स्विकारली कोमेजलेली फुल
वाळलेल्या पानांना आणि तुटल्या पाकळ्यांना
माझ घर होत नेहमीच खुलं

एक दिवस हे सगळ संपल
आणि वाढ्ल फक्त निरूपयोगी गवत
ओल्या आठवणींचीही  आता
फक्त वाळलेलीच सोबत

- **नितीन**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com